महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ साठी ९ व महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब साठी ४६ अशी एकूण ५५ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मविसे १०/२०१५/प्र.क्र.४३/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई ४००००१
तारीख: १६ मार्च, २०१५

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत शिफारस करण्यात येणाऱ्या उमेदवारांच्या नेमणूका करण्याकरीता महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ या संवर्गाची ९ आणि महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब या संवर्गाची ४६ अधिसंख्य पदे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी दिनांक २.५.२०१५ पासून दोन वर्षाच्या कालावधीकरीता निर्माण करण्याकरीता शासन मंजूरी देत आहे. संबंधित परिवीक्षाधिन अधिकाऱ्यांच्या एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाबाबतचे आदेश सामान्य प्रशासन विभागाकडून स्वतंत्ररित्या काढण्यात येतील.

२. महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ व गट-ब मध्ये निवड होणाऱ्या अनुक्रमे ९ व ४६ उमेदवारांना दोन वर्षाच्या कालावधीसाठी विविध स्तरावरील प्रशिक्षण देण्याकरीता प्रशिक्षणार्थी म्हणून दि.२ मे, २०१५ पासून सामान्य प्रशासन विभागाकडून नियुक्ती देण्याचे प्रस्तावित आहे. महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ मधील ९ प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांना पी.बी.३ मध्ये पेबँड रु.१५६००-३९१०० व रु.५४०० ग्रेडपे या वेतनश्रेणीत वेतन प्रदान करावे लागणार आहे आणि महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील ४६ प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांना पी.बी.२ मध्ये पेबँड रु.९३००-३४८०० व रु.४४०० ग्रेडपे या वेतनश्रेणीत वेतन प्रदान करावे लागणार आहे. त्यानुसार गट-अ व गट-ब मध्ये नियुक्ती द्यावयाच्या अनुक्रमे ९ व ४६ उमेदवारांना २ वर्षाच्या प्रशिक्षण कालावधीत वेतन व भत्ते अदा करण्यासाठी एकूण खर्च अनुक्रमे रु.१,०६,४२,३२०/-(रुपये एक कोटी सहा लाख बेचाळीस हजार तीनशे वीस फक्त) व रु.३,५२,१६,४९६/-(रुपये तीन कोटी बावन्न लाख सोळा हजार चारशे शहाण्णव फक्त) एवढा येईल. याप्रमाणे वेतन व भत्ते अदा करण्याचा खर्च सन २०१५-१६ व सन २०१६-१७ मध्ये विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल.

३. महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ आणि गट-ब च्या ५५ अधिसंख्य पदांचे वेतन व भत्ते अदा करण्यासाठी सन २०१५-१६ व २०१६-१७ मध्ये एकूण खर्च रु.४५८.५८ लक्ष (रुपये चारशे अठ्ठावन लक्ष अठ्ठावन हजार फक्त) एवढा असून सदर खर्च हा सन २०१५-१६ व सन २०१६-१७ या वर्षीच्या अतिरिक्त अनुदानातून मंजूर करण्याबाबत वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ व गट-ब च्या वरील ५५ परिवीक्षाधीन पदांवरील दि.२.५.२०१५ ते दि.१.५.२०१७ या कालावधीचा खर्च सन २०१५-२०१६ व सन २०१६-२०१७ या वर्षीच्या मंजूर

अनुदानामधून "२०५३- जिल्हा प्रशासन, ०९३- जिल्हा आस्थापना (३) प्रकल्प गट मुख्यालय, गट विकास अधिकारी (राज्यक्षेत्र) (२०५३०७०७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांकः-पदनि २०१२/ प्र.क्र.६६/१२/वित्तिय सुधारणा, दि.११.७.२०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१६१२३८०९५६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.03.16 13:33:35 +05'30'

**( वि.द.शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महासंचालक, यशदा, पुणे
३. सर्व विभागीय आयुक्त
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद सर्व
६. सर्व कोषागार अधिकारी
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१०.उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती व नागपूर
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प ३, १६ व व्यय-१५),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यासन क्र.वित्त-१, वित्त-९, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवड नस्ती.